न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयाच्या अधिपत्याखालील प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा नागपूर व पुणे येथे संगणक गुन्हे विभाग तसेच नागपूर, पुणे, औरंगाबाद, नाशिक व अमरावती येथे टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन विभाग नव्याने सुरु करण्यास व १६४ पदे करार पध्दतीने भरण्यास शासन मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्रमांक एफएसएल-०४१४/प्र.क्र.३४४/पोल-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ७ एप्रिल २०१५.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग,क्र.सीबीई-१८९३/प्र.क्र.३८/९३/तेरा, दि.१५.२.१९९५
२) शासन निर्णय गृह विभाग क्र.एफएसएल-०३०६/६३४/प्र.क्र.२३१/पोल-४, दि.१७.७.२००६
३) शासन निर्णय गृह विभाग क्र.एफएसएल-०७०८/प्र.क्र.४४५/पोल-४, दि.२०.६.२०११
४) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.मुं/का.२२१/१४, दि.९.१.२०१४
५) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.मुं का/२२४०/१४, दि.१.४.२०१४
६) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.मुं/का/४०७३/१४, दि.४.७.२०१४
७) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.मुं/का/५९१०/१४, दि.२४.९.२०१४

**शासन निर्णय :-**

न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालयातील संगणक गुन्हे विभाग व टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन विभागात दाखल होणा-या प्रकरणांची तसेच प्रलंबित प्रकरणांची वाढती संख्या विचारात घेता या दोन्ही विभागातील थकित प्रकरणांचा निपटारा तातडीने करता यावा आणि विश्लेषण अहवाल मा.न्यायालयास वेळेत सादर करणे शक्य व्हावे, याकरीता प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, पुणे व नागपूर या ठिकाणी संगणक गुन्हे विभाग तसेच प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा नागपूर, पुणे, औरंगाबाद, नाशिक व अमरावती या ठिकाणी टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन विभाग नव्याने सुरु करण्यास तसेच या विभागांसाठी व मुंबई प्रयोगशाळेतील संगणक गुन्हे, टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन व मानसशास्त्र विभागांसाठी लागणाऱ्या अधिकारी व कर्मचारी यांची एकूण १६४ पदे तात्पुरत्या सावधी करार पध्दतीने एक वर्षाच्या कालावधीकरीता ठराविक मानधनावर खालीलप्रमाणे भरण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र. | विभागाचे नांव | पदनाम | पदसंख्या | विहित केलेले आरक्षण | दरमहा मानधन रू. |
|---|---|---|---|---|---|
| १ | संगणक गुन्हे, मुंबई प्रयोगशाळा | वैज्ञानिक अधिकारी, गट (ब) | १५ | **वैज्ञानिक अधिकारी, गट (ब)** अजा-४, अज-२, विजा(अ)-१, भज (ब)-१, भज (क)-१, विमाप्र-१, इमाव-५, खुला-१४ **वैज्ञानिक सहायक, गट (क)** अजा-४, अज-२, विजा(अ)-१, भज (ब)-१, भज (क)-१, विमाप्र-१, इमाव-५, खुला-१४ | १८,०००/- |
| | | वैज्ञानिक सहायक, गट (क) | १५ | | १५,०००/- |
| २ | संगणक गुन्हे, मुंबई,नागपूर व पुणे प्रयोगशाळा | वैज्ञानिक अधिकारी, गट (ब) | १४ | | १८,०००/- |
| | | वैज्ञानिक सहायक, गट (क) | १४ | | १५,०००/- |
| | | **एकूण** | **५८** | | |
| ३ | टेप ऑथेंटिकेशन व स्पीकर आयडेंटिफिकेशन, मुंबई, नागपूर, पुणे, औरंगाबाद, नाशिक व अमरावती | वैज्ञानिक अधिकारी, गट (ब) | ५२ | **वैज्ञानिक अधिकारी, गट (ब)** अजा-७, अज-४, विजा(अ)-२, भज (ब)-१, भज (क)-२, भज (ड)-१, विमाप्र-१, इमाव-९, खुला-२५ **वैज्ञानिक सहायक, गट (क)** अजा-७, अज-४, विजा(अ)-२, भज (ब)-१, भज (क)-२, भज (ड)-१, विमाप्र-१, इमाव-९, खुला-२५ | १८,०००/- |
| | | वैज्ञानिक सहायक, गट (क) | ५२ | | १५,०००/- |
| | | **एकूण** | १०४ | | |
| ४ | मानसशास्त्र, मुंबई प्रयोगशाळा | वैज्ञानिक अधिकारी, गट (ब) | २ | अजा-१, खुला-१ | १८,०००/- |
| | | **एकूण** | **२** | | |
| | | **एकूण(१+२+३+४)** | **१६४** | | |

२. सदर शासन मान्यता खालील अटींच्या अधीन राहील.

(अ) पदभरती करतांना जास्त खपाच्या किमान २ वर्तमानपत्रात जाहिरात देण्यात यावी. विहित पध्दतीने निवड प्रक्रिया पूर्ण करावी.

(ब) उपरोक्त पदांवरील नियुक्त्या एक वर्षापेक्षा कमी किंवा सदर पदावर नियमित नियुक्तीसाठी उमेदवार उपलब्ध होतील तो कालावधी यापैकी जो कमी असेल तेवढया कालावधीसाठी करण्यात याव्यात.

(क) कराराचा कालावधी संपुष्टात येताच नियुक्ती संपुष्टात येईल व सदर पदावर केलेल्या सेवेमुळे अन्य कोणत्याही पदावर नियुक्ती मिळण्याचा/समावेशनाचा हक्क प्राप्त होणार नाही, ही बाब नियुक्ती आदेशात स्पष्ट करण्यात यावी.

(ड) सेवानिवृत्त राज्य शासकीय अधिकारी/कर्मचा-यांना नियुक्ती देण्यात येऊ नये.

(इ) सदर पदे भरताना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.१५.२.१९९५ व दि.१४.१.२०१० मधील अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करावे.

(ई) सदर पदावर नियुक्ती करताना मुंबई उच्च न्यायालयातील जनहित याचिका क्र.८५/२००८ वर मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाचा अवमान होणार नाही,अशा त-हेने नियुक्ती करण्यात येईल याची विभागाने दक्षता घ्यावी.

(उ) अशा प्रकारे करार नियुक्तीमुळे सद्य:स्थितीत शासन सेवेत असलेल्या कोणत्याही अधिका-याच्या पदोन्नतीच्या संधीवर प्रतिकूल परिणाम होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

(ऊ) या पदांवर नियुक्त करण्यात येणा-या अधिकारी/कर्मचा-यांना वरीलप्रमाणे वित्त विभागाने ठरवून दिलेल्या मर्यादेत ठोक मानधन देण्यात यावे.

(ह) सदर पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदींनुसार भरण्यात यावीत.

(घ) सदर नियुक्ती केवळ तात्पुरत्या स्वरुपाची असून सदर अधिका-यांना कोणतीही सेवा सातत्य मिळण्याबाबत कोणताही हक्क राहणार नाही.

३. प्रस्तुत पदे खालील निवडसमितीमार्फत Walk-in-Interview व्दारे भरण्यात यावीत.

| | |
|---|---|
| १.संचालक,न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई | : अध्यक्ष |
| २.उपसचिव (पोल-४), गृह विभाग, महाराष्ट्र शासन | : सदस्य |
| ३.प्राध्यापक (मानसशास्त्र/संगणक/इलेक्ट्रॉनिक्स/भौतिक/माहिती व तंत्रज्ञान) मुंबई विद्यापीठ, मुंबई | : सदस्य |
| ४.सहसंचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, मुंबई | : सदस्य-सचिव |

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.१५०/२०१४/१३, दि.३१.१.२०१५ व अनौपचारिक संदर्भ क्र.१२८अ/१५/१६-ब, दि.३०.३.२०१५ आणि वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.७२/१५/व्यय-७, दि.२५.२.२०१५ व अनौपचारिक संदर्भ क्र.६६/विसु-१, दि.१०.३.२०१५ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१७१६०५३०९५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Surendra Ambadas Deshmukh

Digitally signed by Surendra Ambadas Deshmukh
DN: CN = Surendra Ambadas Deshmukh, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.17 16:19:29 +05'30'

**(सु.अं.देशमुख)**
**अवर सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा.राज्यमंत्री (गृह) (शहरे) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
५) अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
८) सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) संचालक, न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३) उपसंचालक, प्रादेशिक न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा, नागपूर/पुणे/औरंगाबाद/
१४) नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड
१५) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/पुणे/औरंगाबाद/नाशिक/अमरावती/कोल्हापूर/नांदेड
१६) सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१३/१६-ब) मंत्रालय, मुंबई,
१७) वित्त विभाग (व्यय-७/विसु-१) मंत्रालय, मुंबई-३२,
१८) निवडनस्ती/गृह विभाग (पोल-४).